विजाभज प्रवर्गाच्या अनुदानित प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक आश्रमशाळेतील परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत योजनेच्या सभासदचा सेवा कालावधीत मृत्यु झाल्यास त्याच्या कुटुंबियांना द्यावयाच्या सानुग्रह अनुदान व लाभाबाबत.
नवीन लेखाशिर्ष उघडण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्र.विभशा-२०१९/प्र.क्र.७०९/विजाभज-२**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक - १९/५/२०२०.

वाचा:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.-अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९ सप्टेंबर, २०१८.
२) इतर मागास वर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, शासन निर्णय दि.१९ ऑगस्ट, २०१९.

**प्रस्तावना:-**

दि.१/११/२००५ रोजी व त्यानंतर सेवेत लागलेल्या व परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेचा सदस्य असणाऱ्या कर्मचाऱ्याचा १० वर्षाची सेवा पूर्ण होण्यापूर्वी सेवेत असतांना मृत्यु झाल्यास त्याच्या नामनिर्देशीत व्यक्तीस, नामनिर्देशन केले नसल्यास त्याच्या कायदेशीर वारसास सानुग्रह अनुदान रु.१०.०० लक्ष अधीक कर्मचाऱ्याच्या खाती जमा असलेली संचित रक्कम देण्याचा निर्णय वाचा येथील क्र.१ अन्वये वित्त विभागाने घेतला आहे. त्यानुसार या विभागाच्या आश्रमशाळांतील कर्मचाऱ्यांना सदर योजना लागू करण्याबाबत वाचा येथील क्र.२ अन्वये विभागाने निर्णय घेतला असून त्याबाबतचा शासन निर्णय निर्गमित केलेला आहे.

विभागाने वरीलप्रमाणे दि.१९/८/२०१९ नुसार घेतलेल्या निर्णयानुसार योजनेंतर्गत विभागाच्या आश्रमशाळांतील कर्मचाऱ्यांना सदर योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदानाचा लाभ देण्याबाबतचा खर्च भागविण्यासाठी स्वतंत्र लेखाशिर्षाची आवश्यकता असल्याने त्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास तसेच महालेखापाल कार्यालयास सादर केलेला होता.

महालेखापाल कार्यालयाने तसेच वित्त विभागाने दिलेल्या मंजूरीनुसार नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब विचाराधीन होती. त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय:-

माध्यमिक व उच्च माध्यमिक आश्रमशाळेतील परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत योजनेच्या सभासदाचा सेवा कालावधीत मृत्यु झाल्यास त्याच्या कुटुंबियांना द्यावयाच्या सानुग्रह अनुदान व लाभाबाबत खालीलप्रमाणे नवीन लेखाशिर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

नवीन लेखाशिर्षाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| लेखाशिर्षाचे मराठी नांव | | लेखाशिर्षाचे इंग्रजी नांव | |
|---|---|---|---|
| मागणी क्रमांक | जी-६ | Demand No. | G-6 |
| प्रधान लेखाशिर्ष | २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ | Major Head | 2071-Pension and other Retirement Benefits |
| उपप्रधान लेखाशिर्ष | ०१-नागरी | Sub Major Head | 01-Civil |
| गौण शिर्ष | १०३-अनुकंपा भत्ते | Minor Head | 103-Compassionate Allowance |
| गट शिर्ष | (००) | Group Head | (00) |
| उप गट शिर्ष | (००)(०९) विजाभज प्रवर्गाच्या प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक खाजगी अनुदानित आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांच्यासाठी परिभाषित अंशदान/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान | Sub Group Head | (00)(09) Defined Contributory / National Pension Scheme Ex-gratia, for Teaching and Non-Teaching Staff of Primary, Secondary and Higher Secondary Private Granted Ashram Schools of VJNT Class |
| अनिवार्य/ कार्यक्रम | अनिवार्य / दत्तमत | Committed / Scheme | Committed/Voted |
| संगणक सांकेतांक | २०७१०७६७ | CRC | 20710767 |
| उद्दिष्ट | ०४-निवृत्तीवेतनविषयक खर्च | Object | 04-Pensionary Charges |

२. हे आदेश महालेखापाल कार्यालय (लेखा व हकदारी)-१, महाराष्ट्र, मुंबई यांच्याशी विचारविनिमय करुन त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.ख.नि/चा-१/विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण विभाग/यूओआर- १७९/२०१९-२०/११२८, दिनांक १३/२/२०२० तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६३/२०२०/व्यय-१४, दिनांक ३/३/२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००५१९१५२२०३३२२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Bhaurao
Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2020.05.26 13:53:04 +05'30'

**( भा. र. गावित )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
५. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग (सर्व)
६. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (सर्व)
७. जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८. सर्व मुख्याध्यापक, विजाभज, प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक आश्रमशाळा,
९. स्वीय सहायक, मा.प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (विजाभज-२)